बहुधा जागा नसते. व येथें नाहीं यासाठीं गौरीशंकरांनीं लाविलेली उत्पत्ति काल्पनिक दिसते; तिच्याऐवजीं आम्ही दुसरी उपपत्ति वाचकांसमोर मांडतों ती अशी कीं, हीं वर्षें गुहसेनाच्या राज्यारोहणापासून मानावीं. या भटार्कानंतरच्या वलभीच्या तिसऱ्या राजापासून गुहिलवंशशाखा ईडर येथें निघाली असा समज आहे. भाग १ यांत गुहसेनाचा राज्यारोहणाचा काळ इ. स. ५३९ हा दिला आहे. यांत १९१ मिळविले असतां ७३० इ. स. हा काळ बप्पा रावळाच्या राज्यारोहणाचा निघतो. आणि बप्पा हा यावेळीं ३० वर्षांचा मानला असतां त्याचा जन्मकाळ इ. स. ७०० हाच सिद्ध होतो. बप्पाचें वय २२ मानलें तर जन्मकाळ इ. स. ७०८ येईल आणि १८ मानलें तर ७१२ हाहि येईल. हीं तिन्ही वर्षें १८, २२, ३० शक्यतेच्या कोटींतील आहेत. कमींत कमी १८ आणि जास्तींत जास्ती ३० वर्षें धरतां येतात हें इतिहासज्ञांस सांगावयास नको.

आम्हीं दिलेली १९१ ची वरील उपपत्तीच रायसागर शिलालेखावरून संभवनीय दिसते हें येथें सांगणें जरूर आहे. या लेखांत म्हणजे राजप्रशस्तींत संवत् हा शब्द मुळींच वापरला नसून, "१९१ वर्षें गेल्यावर बप्पाचा भाग्योदय झाला" एवढेंच म्हटलें आहे. तेव्हां १९१ वर्षें कोठपासून गेल्यावर सांगण्याचा लेखकाचा उद्देश होता हें ठरविण्यास ज्या सर्गांत हीं वर्षें दिलीं आहेत त्या सर्गाच्या आरंभापासूनच्या हकीकतीकडे लक्ष दिलें पाहिजे. यापूर्वींच्या सर्गांत कनकसेन अयोध्येहून निघाल्याची हकीकत प्रथम दिली असून त्याचा वंशज विजयसेन हा दक्षिणेंत आल्यावर त्यास आकाशवाणी होऊन अशी आज्ञा झाली कीं, सेन हें उपपद टाकून आदित्य हें उपपद घ्यावें. ( भावनगर इं. पृ. १४९ ) नंतर या सर्गाच्या आरंभीं असें सांगितलें आहे कीं, विजयसेनाचा पुत्र पद्मादित्य हा राज्य करूं लागला. आणि त्याचे वंशज चौदा आदित्य उपपदधारी झाल्यावर शेवटचा गुहादित्य याचा ज्येष्ठ पुत्र बप्पा होता. वरील पूर्वींच्या संदर्भावरून असें स्पष्ट दिसतें कीं, १९१ वर्षें हीं आदित्य उपपदधारी राजे वलभी किंवा ईडर येथें झाल्यापासून १४ पिढ्या गेल्यावर बप्पाचा भाग्योदय झाला. १४ पिढ्यांना १९१ वर्षें हा काळ

संभवनीय असून याविषयीं निःसंदेह असेंच म्हणतां येते कीं, जेव्हांपासून आदित्यान्ताची नामपद्धति वलभी किंवा ईडर येथें झाली तेव्हांपासून हीं वर्षें मोजलीं गेलीं आहेत. याहि उपपत्तीनें बप्पाचा काळ त्यावेळच्या इतिहासाशीं जुळता असा इ. स. ७३० हा येतो. गौरीशंकर ओझ्यांनीं कल्पिल्याप्रमाणें वि. सं. ७९१ च्या ऐवजीं कोठें तरी कोणी तरी १९१ वाचलें असें मानलें तर राज्यारोहणाचा काळ ७३४ इ. स. येतो. फरक चार वर्षांचाच आहे. पण जर गुहादित्य ( उर्फ गुहसेन ) यानें राज्यावर येण्यापूर्वी चार वर्षें ही ईडरशाखा स्थापिली असें मानलें तर हेंहि वर्ष योग्यच ठरतें. तात्पर्य, गौरीशंकर ओझा यांनीं ठरविलेला बप्पाच्या राज्यारोहणाचा काळ व आम्हीं ठरविलेला काळ यांत फारसा फरक नसला तरी आम्हीं दिलेली ही १९१ची नवीन उपपत्ति जास्त सुयुक्तिक व रायसागरलेखाला धरून आहे. बप्पाचा राज्यारोहणकाळ निश्चित झाल्यावर त्याचा जन्मकाळ तेव्हां त्याचें वय अंदाजानें मानावें त्याप्रमाणें मागें पुढें ठरेल. तो १५ वर्षांचा होता ही दन्तकथा सोडलीच पाहिजे. तो १८ पासून ३० वर्षांचा धरून त्याचा जन्मकाळ ७१२ इ. स. पासून ७०० पर्यंत केव्हांहि मानतां येईल, यापेक्षां जास्त नक्की काळ करण्यास अद्याप साधन उपलब्ध झालेलें नाहीं.

बप्पाच्या राज्यारोहणाची मिति वरील चर्चेत निश्चित झालीच आहे. तथापि एक दोन गोष्टींचा जास्त खुलासा केला पाहिजे. १९१ वर्षें तोंडच्या दन्तकथेंत आणि रायसागर शिलालेखांत बप्पाच्या राज्यारोहणाचें दिलेलें आहे. हें वर्ष या लेखाचा मागील संदर्भ पाहतां जेव्हां विजयभूपाच्या पुत्रानें सेन उपपद सोडून आदित्य उपपद धारण केलें तेव्हांपासून मोजलीं आहेत. हा निर्देश वलभी कुलाचा आहे हें स्पष्ट आहे यांत प्रारंभीं सेन उपपद असून पुढें पुढें सर्वच शिलादित्य नांवाचे राजे झाले ( पहिला भाग वलभी वंशावळी पहा ). दुर्दैवानें वलभी वंशावळींत विजयसेन नांव नाहींच आणि दुसरीं १४ नांवें आदित्यांत दिलीं आहेत त्यांपैकीं बहुतेक म्हणजे पद्मादित्य, शिवादित्य वगैरे नांवें नाहींत. एक शीलादित्य नांव मात्र आहे. ( हें नांव वलभी घराण्यांत ७ वेळा आलेलें असून सहा वेळा लागोपाठ आलेलें आहे ). रायसागर लेखांत दिलेल्या

मह्मादित्य वगैरे नांवाविषयीं जास्त चर्चा पुढें येईल. पण येथें हें सांगणें इष्ट आहे कीं, आमच्या मतें ही नांवें ईडर किंवा नागदा ( नागऱ्हद ) येथील शाखेच्या राजांचीं आहेत; व ही शाखा वलभी कुलांतील गुहसेनापासून निघाली असा समज आहे. याजबद्दल कांहीं लेख उपलब्ध नसून आम्ही केवळ तोंडच्या दन्तकथेनुसार हा मजकूर लिहितों. परंतु नागदा येथें शाखा असो किंवा ईडर येथें असो हा मुद्दा महत्त्वाचा नाहीं. ही गोष्ट निश्चित आहे कीं, रायसागर लेख वि. सं. १७३२ म्हणजे इ. स. १६७५ इतका जुना असून त्यावेळची जी समजूत व माहिती उदेपुर घराण्याची शिलालेखांत नमूद केली गेली त्या समजुतीप्रमाणें मेवाड-घराण्याचा वलभी घराण्याशीं जेव्हां संबंध जडतो तेव्हांपासून बप्पापर्यंत १९१ वर्षें धरला जातो. हा संबंध दन्तकथेंत वलभी वंशातील गुहसेनापासुन जडविला आहे आणि त्यासच गुहिल असेंहि म्हटलें आहे. याचा राज्यारोहणकाळ इ. स. ५३९ असून त्यांत १९१ मिळविले तर इ. स. ७३० हा बप्पाचा राज्यारोहणकाळ येतो व तो इतिहासाशीं सुसंगत आहे. मानमोरीचा चितोड येथील लेख पूर्वीं सांगितल्याप्रमाणें वि. सं. ७७० म्ह. इ. स. ७१३ चा आहे आणि आरबांनीं सिंध इ. स. ७१२ मध्यें जिंकून पुढें राजपुतान्यावर स्वाऱ्या सुरू केल्या त्यावेळीं बप्पानें इ. स ७३०त आरबांचा पराभव करून चितोड गादीवर मोरीस बाजूस सारून आरोहण केलें.

शेवटीं आपणांस बप्पाच्या राज्यत्यागाची मिति ठरविणें आहे. मेवाडच्या दन्तकथांच्या आधारें टॉडनें ही मिति वि. सं. ८२० दिली आहे. परंतु रायबहादुर गौरीशंकर यांनीं ही मिति ८१० आहे असें अनेक लेखांतील आंकड्यांवरून नव्हे तर 'खचन्द्रदिग्गज' या स्पष्ट शब्दावरून दाखविलें आहे ( एकलिंगमहात्म्य व इतर लेख आधारास दिले आहेत पृ. २७० ). पण गौरीशंकर ओझा यांनीं असेंहि दाखविलें आहे कीं, बिकानेर येथील लेखांत हा काळ शक पञ्चाष्टषट् ( ६८५ ) असा दिला आहे. म्हणजे ७८ मिळविले असतां इ. स. ७६३ असा येतो. आणखी ५७ मिळविले म्हणजे वि. सं. ८२० च ठरतो (डॉ. टेसिटोरी यांनीं संपादिलेला भाटाचे व इतर ऐतिहासिक लेखांचा वर्णनात्मक

कॅटलॉग भाग २ पान ६३ ). याप्रमाणें मेवाड व बिकानेर लेखांत फरक असून हा काळ वि. सं. ८१० किंवा ८२० असा संशयित येतो तरी आमच्या मतें ८२० च ग्राह्य आहे. कारण ही दन्तकथा सर्वमान्य आहे कीं, बप्पानें पुष्कळ वर्षें राज्य केल्यावर प्राचीन राजांप्रमाणें पुत्राला राज्य सोंपवून तो एकलिंगचरणीं तप करण्यास गेला. आतां गौरीशंकर यांनीं दिलेल्या मित्या घेतल्या तर बप्पाचा जन्म इ.स. ७१२त, राज्यारोहण इ. स. ७३४ त आणि राज्यत्याग इ. स. ७५३ ( वि. सं. ८१० ) त येतो म्हणजे राज्य सोडतेवेळीं त्याचें वय अवघें ४१ वर्षांचें येतें आणि राज्य फक्त १९ वर्षेंच केलें असें होतें. यासाठीं ज्या मित्या आम्हीं सुचविल्या आहेत त्या अधिक जुळणाऱ्या आहेत. बप्पाचा जन्म इ. स. ७०० त होऊन तो चितोडच्या राज्यावर इ. स. ७३० त आला आणि त्यानें राज्य इ. स. ७६३ ( वि. सं. ८२० ) त सोडलें असें म नलें म्हणजे बप्पानें ३३ वर्षें राज्य करून ६३ व्या वर्षीं राज्यत्याग केला असें ठरतें आणि बप्पानें पुष्कळ वर्षें राज्य केल्यावर उतारवयांत राज्य सोडलें या दन्तकथेशीं ज्यास्त मेळ बसतो. तात्पर्य, बप्पाच्या राज्यत्यागाची मिति बिकानेर येथील लेखी परंपरेप्रमाणें व टॉडनें दिलेल्या मेवाड येथील तोंडी परंपरेप्रमाणें वि. सं. ८२० हीच धरली पाहिजे. असो, याप्रमाणें रायबहादुर गौरीशंकर ओझा यांच्या मतांशीं आमचा विसंवाद असला तरी तो थोडा आहे. आणि हें तर निर्विवाद आहे कीं, गौरीशंकर यांनीं दोन तीन चुक्या स्पष्टपणें दाखविल्या असून अनेक लेखांचे आधार जिज्ञासु वाचकांपुढें ठेविले आहेत. ह्यावरून प्रत्येक वाचकास या विषयासंबंधानें आपलें मत योग्य रीतीनें ठरविण्यास साधन झालें आहे. मतभेद सोडले तर ही गोष्ट निश्चयात्मक होय कीं, बप्पारावळ चितोडच्या गादीवर इ. स. ७५० मध्यें होता

### ३ गुहिलोतांच्या वंशावळींत बप्पाचें स्थान.

हा प्रश्न बप्पाविषयक प्रश्नांत अत्यंत वादग्रस्त आहे आणि दुर्दैवानें रायबहादुर गौरीशंकर ओझा यांचा आणि आमचा या प्रश्नासंबंधें मोठाच मतभेद आहे. कारण त्यांच्या मतें गुहिलोत वंशावळींतील कालभोज म्हणजे बप्पा होय आणि आमच्या मतें त्या वंशावळींतील

पहिला पुरुष गुहदत्त म्हणजे बप्पा होय. या वंशावळीसंबंधें फारसा इतर मतभेद नाहीं. डॉ. डी. आर. भांडारकर यांनीं नुकताच प्रसिद्ध केलेला आटपुरा येथील शिलालेख सर्वमान्य असून त्यांत दिलेली वंशावळ आतां बहुतेक सर्वत्र सम्मत आहे. या शिलालेखारंभींच्या श्लोकांतील महीदेव हा शब्द वादग्रस्त असून त्याविषयीं विस्तृत चर्चा या भागांत आलेली आहे आणि या श्लोकांत आलेला गुहदत्त कोण याजविषयींहि पुष्कळ वाद आहे. श्लोक येणेंप्रमाणें आहे ' आनन्दपुरविनिर्गत विप्रकुलानन्दनो महीदेवः ॥ जयति श्री गुहदत्त प्रभवः श्रीगुहिलवंशस्य ॥ विप्रकुलांना आनंददेणारा आनंदपुराहून आलेला श्रीगुहदत्त श्रीगुहिलावंशाचा प्रभव जयशाली असो ' असें भाषान्तर होईल. यापुढें या शिलालेखांत राजे दिले आहेत ते असे २ गुहिल ३ भोज ४ महेन्द्र ५ नाग ६ शील ७ अपराजित ८ महेन्द्र दु. आणि ९ कालभोज. आतां गौरीशंकर कालभोजास बप्पा म्हणतात पण आम्ही पहिला गुहदत्त यासच बप्पा दन्तकथेवरूनच नव्हे तर अबू व चितोडलेखांतील वंशावळीच्या आधारें मानतों. रायबहादूर गौरीशंकर यांनीं पृ.२७५वर निरनिराळ्या ५ लेखांवरून ५ वंशावळींचें एक कोष्टक दिलें आहे, हे पांच लेख म्हणजे ( १ ) आटपुरा वि. सं. १०३८ चा ( २ ) चितोड वि. सं. १३३५ चा ( ३ ) अबू वि. सं. १३४२ चा ( ४ ) बाणपुरा लेख वि. सं. १४३६ चा आणि ( ५ ) कुमलगड लेख वि. सं. १५१७ चा. यापैकीं ३ लेखांत म्हणजे चितोड, अबू व बाणपुरा लेखांत बप्पा मूळ पुरुष दिला असून त्याचा पुत्र गुहिल दिला आहे, व त्याचे वंशज भोज, शील, कालभोज हे दिले आहेत; पांचव्या कुमलगड लेखांत शीलाच्या ऐवजीं बप्पा दिला असून त्याच्या पुढें चौथ्या पिढींत कालभोज दिला आहे; आणि पहिल्या आटपुरा लेखांत बप्पाचें नांव मुळींच दिलेलें नाहीं; परंतु ज्याअर्थीं त्यापूर्वीं ६ वर्षांच्याच म्हणजे वि. सं. १०२८ च्या नरवाहन लेखांत बप्पाचें नांव प्रारंभींच दिलें आहे त्याअर्थीं आटपुरा लेखकानें प्रारंभींचा गुहदत्त हाच बप्पा मानलेला निःसंशय दिसतो. किंबहुना गुहदत्ताचाच फक्त जयकार केला असून तो गुहिल वंशाचा जनक वर्णिला आहे, यावरून गुहदत्त आणि बप्पा एक अशीच

अनुमिति निघते. तेव्हां सरळ मार्ग सोडून काळभोजांशीं बप्पाचा एकीभाव करण्यास गौरीशंकर ओझ्यांस काय अडचणी उपस्थित झाल्या त्यांचा आपण विचार करूं आणि त्या अडचणी अपरिहार्य आहेत काय हेंहि पाहूं.

पहिली अडचण उत्पन्न होते ती शील आणि अपराजित या राजांच्या शिलालेखासुळें उत्पन्न होते. हीं नांवें या वंशावळींत आहेत, आणि त्यांच्या शिलालेखांचे काळ वि. सं. ७०३ आणि ७०८ असे आहेत म्हणजे इ. ६४६ व ६६१ चे हे राजे ठरतात. बप्पाची बहुतेक निश्चित राज्यारोहण मिति इ. स. ७३० असल्यानें हे राजे बप्पाचे वंशज असूं शकत नाहीत. किंबहुना बप्पास यांचा वंशज निदान तीन पिढयानंतरचा मानला पाहिजे. परंतु हे राजे याच गुहिलवंशांतील हेच राजे आहे असें निश्चित करण्यास त्यांच्या शिलालेखांत कांहींच साधन नाहीं. ते गुहिलवंशी आहेत एवढेच निश्चित; पण गुहिल हें नांवसुद्धां अनेकांचें आहे आणि गुहिलवंशहि भिन्न आहेत. गुहिल नांव चाटसु लेखांत दोनदां आलें आहे आणि हल्लीं भावनगरचे गुहिलवंशी आणि उदेपूरचे गुहिलवंशी हे राजे अगदीं निराळे राजे आहेत. आणि हे राजे एकाच गुहिलवंशाचे मानले तर ते राजे ज्यांचे लेख इ. स. ६४६ व ६६१ चे सांपडले आहेत ते ७३० इ. च्या बप्पाचे निराळे पूर्वज असूं शकतील आणि बप्पाच्या वंशांत पुन्हां तींच नांवें येऊं शकतील. तेव्हां या अडचणीचा भाग अपरिहार्य नाहीं.

प्रथम कारण असें कीं, बप्पाचा गुहिल हा पुत्र होता आणि तो स्वतः एका गुहिलवंशांत जन्मला होता म्हणजे त्याचा एक पूर्वज गुहिल होता. चितोड आणि अबू लेख स्पष्टपणें असें सांगतात कीं, बप्पाचा पुत्र गुहिल होता आणि तो त्यामागून गादीवर बसला आणि त्याच्या नांवानें त्याचा वंश पुढें चालूं झाला (यस्य नामकलितं किल जातिं भूभुजो दधति तत्कुलजाताः ॥). हें नांव गुहिलवंश असून अर्वाचीन भाषेंत गुहिल पुत्र अथवा गुहिलोत असें प्रसिद्ध आहे. तेव्हां हे इतके प्राचीन लेख (सं. १३३२ व १३४१) बाजूला टाकून बप्पाला कालभोज मानून त्याचा पुत्र भलताच कां मानावा ? वि. सं. १०२८ च्या नरवाहन लेखांतील 'गुहिलगोत्रनरेन्द्रचन्द्र' या पदाचा अर्थ दोन तऱ्हेनें होऊं शकेल.

गुहिलगोत्र शब्दानें बप्पानंतर झालेले सर्व राजे समजून त्या त्यांना हा चंद्रासारखा होता; किंवा नागदा येथें जें गुहिलगोत्र वलभीच्या गुहसेनापासून झालें व ज्यांत बप्पाचा जन्म झाला त्या गोत्रांतील राजतारकांना बप्पा चन्द्रासारखा होता; तात्पर्य गुहिल दोन याच कुळांत होते, एक बप्पाचा पुत्र गुहिल आणि दुसरा बप्पाचा पूर्वज याबद्दल आम्हांस शंका नाहीं. बप्पाच्या पूर्व राजांना गुहिल संज्ञा होती आणि बप्पाच्यानंतरच्या राजांना गुहिलोत ही संज्ञा रूढ झाली. बहुधा ही दुसरी संज्ञा पूर्व राजांपासून भेद दाखविण्यासाठींच रूढ झाली असावी.

या रीतीनें आटपुरा लेखाचा आणि अबू व चितोड लेखांचा मेळ चांगला बसतो. आतां कांहीं राजे यापुढच्या लेखांत वगळले आहेत पण ते महत्त्वाचे नसल्यानें वगळले गेले आहेत. पण जर आपण गुहदत्त आणि गुहिल हे एकच असें आटपुरा लेखांत मानलें आणि पुढील कित्येक पिढ्यानंतर येणारा कालभोज यास बप्पा मानलें तर या दोन लेखांत अत्यंत विरोध प्रारंभांतच येणार आहे. आमच्या मतें आटपुरा लेखाच्या पहिल्या श्लोकांत गुहदत्त हा गुहिलाहून भिन्न होता असें मानण्यास कांहींच हरकत नाहीं. 'गुरुदत्तः प्रभवः श्रीगुहिलवंशस्य' या पदांनीं गुहदत्त आणि गुहिल हे एकच होते असें सूचित होत नाहीं. कारण गुहिलवंशाचा जनक गुहदत्त होता या म्हणण्यांत गुहदत्ताचा पुत्र गुहिल असून त्याचें नांव त्याच्या कुळास पडलें या कथेचा अन्तर्भाव होतो. शिवाय गुहदत्ताचा जयजयकार असो या म्हणण्यानें गुहदत्त हा अत्यंत पूज्य व महत्त्वाचा राजा होता हें सूचित होतें. जर गुहदत्तच बप्पा होय असें न मानतां त्यास कित्येक पिढ्यांनीं येणाऱ्या कालभोजशीं अभिन्न मानलें तर गुहदत्तानें सर्वातिशय काय पराक्रम केला होता हें समजलें पाहिजे. चितोड येथें गुहिलोतराज्य स्थापन करण्याचा मान वंशस्थापकाकडे न जातां कित्येक पिढ्यानंतरच्या कालभोजाकडे जातो ! !

हा दोष गौरीशंकर ओझा यांच्या लक्षांत आला असावा, कारण त्यांनीं गुहदत्त उर्फ गुहिल, वंशस्थापक याचा पराक्रम मोठा होता हें दाखविण्यासाठीं त्याचीं नाणीं आगऱ्याजवळ सांपडलीं असून त्याचें राज्य इतकें विस्तृत होतें असें दाखविलें आहे (पृ. २८३). हीं नाणीं थोडीं योडकीं

नव्हे, २००० इतकीं सांपडलीं; अर्थात् ती मेवाडांतून कोणी नेलीं होतीं असें म्हणतां येत नाहीं. हीं नाणीं तेथेंच चालू असावीं असें कनिंगहॅम आर्किऑलॉजिकल सर्वे रिपोर्ट व्हा. ४ चे संपादक कार्लाइल साहेब म्हणतात ( पा. ९५ ). आम्हीं हा रिपोर्ट काढून पाहिला त्यावरून कार्लाइलच्या मतें हा गुहिल आटपुरालेखांतील गुहिल होऊं शकत नाहीं. शील आणि अपराजित यांचा हा पूर्वज आहे असें गौरीशंकर मानतात तर याचा काळ इ. स. ५९८ सुमारास पडतो. आटपुरालेखांत दिलेल्या वंशावळींत प्रत्येक पिढीची सरसरी १२ वर्षें पडते, २० वर्षें पडत नाहीं हें पुढें येईलच. शीलाचा शिलालेख इ. स. ६४६ चा आहे. याच्यापूर्वी चौथ्या पिढीवर गुहिल येतो तेव्हां ४८ वर्षें वजा यांत करतां गुहिलाचा काळ ५९८ इ. स. ठरतो. या काळीं हिंदुस्थानांत थानेश्वराचा प्रतापवर्धन हा अत्यंत बलवान राजा होता आणि कनोजचे मौखरि राजेहि बलवान होते. तेव्हां गुहिलाचें राज्य उत्तर हिंदुस्थानांत आग्र्यापर्यंत पसरणें शक्य नाहीं. जर आपण वीस वर्षांची पिढीची सरासरी घेतली आणि गुहिलास आणखी मागें ४० वर्षें नेलें तर त्याचा काळ सुमारें इ. स. ५५८ येईल पण हा गुहिल वलभी घराण्यांतील गुहसेनाहून भिन्न होऊं शकत नाहीं. किंबहुना कार्लाइल साहेबांनीं यांचेंच नांव सुचविलें आहे. ते म्हणतात " २००० वर नाणीं आग्र्याजवळ सन १८६९ त सांपडलीं आहेत व त्यांवर संस्कृताच्या पश्चिमेकडील जुन्या वळणाच्या अक्षरांत ' गुहिलश्री ' किंवा ' श्रीगुहिल ' असें मीं स्पष्टपणें वाचलें आहे. हीं नाणीं श्रीगुहदत्त अथवा गुहिल मेवाडच्या गुहिलोत वंशाचा स्थापक ( इ. स. ७५० ) याचींच मानलीं असतीं परंतु या नाण्यावरील अक्षरें इतक्या अलीकडच्या काळचीं नसून फार जुनीं आहेत. तेव्हां हीं नाणीं वलभी अथवा सौराष्ट्रांच्या घराण्यांतील शिलादित्याचा पुत्र गुहिल अथवा गुहादित्य अथवा ग्रहादित्य त्याच वंशातील याचीं असतील काय ? त्याचा काळ निश्चित नाहीं तरी इ. स. सहाव्या शतकाचा सुमार दिसतो. " वलभी अथवा सौराष्ट्राचा इतिहास कार्लाईलच्या वेळीं पूर्णपणें उद्घाटित झालेला नव्हता तरी सदर नाणीं सहाव्या शतकइतकीं जुनीं आहेत हें कार्लाईलनें सांगितलें आहे आणि वलभीचा पहिला गुहदत्त, ज्यापासून

गुहिलवंश—शाखा निघाली त्याचीं हीं नाणीं असावीं असा त्यानेंहि तर्क केला आहे. आपल्यास आतां निश्चितपणें ठाऊक आहे कीं गुहसेनाचा राज्यकाळ इ. स. ५३९ ते ५६९ आहे आणि यानेंच प्रथम स्वातंत्र्य धारण करून नामशेष झालेल्या गुप्तांचा अम्मल झुगारून दिला. गुप्तांच्या पडत्या काळांत याचें राज्य आग्र्यापर्यंत पसरणें संभवनीय आहे. कारण यावेळीं थानेश्वरचे वर्धन किंवा कनोजचे मौखरि अद्याप प्रबल झाले नव्हते. तात्पर्य यावरून हें निश्चित होतें कीं, दोन गुहिल प्रसिद्धि पावले. एक बप्पाच्या पूर्वींचा आणि दुसरा त्याचा पुत्र गुहिल ज्याचें नांव गुहिलोत हें पुढील वंशास दिलें गेलें, आणि आमचें असें म्हणणें आहे कीं ज्या शील आणि अपराजिताचे लेख इ. स. ६४६—६६१ चें मिळाले आहेत ते बप्पाचे पूर्वज होते आणि पूर्वगुहिलवंशी होते आणि आटपुरा लेखांत जे शील व अपराजित सांगितलें आहेत ते अन्य असून ते बप्पाचे वंशज आहेत. त्याच वंशांत पूर्वींचीं नांवें पुन्हा पुन्हा येतात हें प्रसिद्धच आहे.

येथें चाटसु लेखाचा पुन्हा विचार करणें प्राप्त आहे, कारण त्यांत गुहिलवंशाचा उल्लेख आहे आणि हा गुहिलवंश आणि मेवाड गुहिलवंश एक समजले गेले आहेत या शिलालेखांत भर्तृपट्टापासून १२ राजांचीं नांवें येणेंप्रमाणें दिलीं आहेत:—

१ ईशानभट २ उपेंद्रभट ३ गुहिल ४ धनिक ५ आँक ६ कृष्णराज ७ शंकरगण ८ हर्षराज ९ गुहिल १० भट्ट ११ भटादित्य १२ विग्रहराज यांपैकीं हर्षराजासंबंधें असा उल्लेख आहे कीं, यानें उत्तरेकडील राजांस जिंकिलें. आणि भोजराजास घोडे नजर केले. यावरून तो भोजाचा अंकित असून समकालीन होता आणि त्याचा काल इ. स. ८४० ठरतो हा भोज डॉक्टर डी. आर. भांडारकरांनीं म्हटल्याप्रमाणें कनोज भोज प्रतिहार साम्राट मानून हा काळ दिला आहे. आतां आपण श्रीहर्षापासून मागे ८ पिढ्या जाऊन भर्तृपट्ट वंशसंस्थापक याचा काळ निश्चित केला तर तो ८४०—१६०=६८० इ. स. सुमारें येतो. बप्पाचा निश्चित काळ ७५० इ. स. हा आहे आणि कालभोज हाच बप्पा मानला तरी आटपुरा लेखांतील वंशावळींत सुद्धा पहिला भर्तृपट्ट

हा काळभोजानंतर ६ पिढ्यांनीं आहे. अर्थात् तो भर्तृपट्ट हा नव्हे. चाटसु-लेखांतील भर्तृपट्ट गुहिलवंशी खरा पण इ. स. ६८० च्या सुमाराचा आणि आटपुरांतील भर्तृपट्ट इ स. ७५० नंतर कित्येक वर्षांनीं आलेला. तेव्हां भर्तृपट्ट हें नांव या वंशांत दोन तीनदां आलें आहे आणि एक भर्तृपट्ट बप्पाच्या पूर्वीं आणि एक बप्पाच्या नंतर. तसेंच त्यापूर्वींच्या भर्तृपट्टाचा गुहिलवंश म्हटलेला आटपुरा लेखांत म्हटलेल्या गुहिल वंशाहून निराळा होय. गुहदत्त किंवा गुहिल आणि कालभोज यांच्यादरम्यान कोणी भर्तृपट्ट नाहीं. अर्थात् चाटसुशिलालेखांत वर्णिलेला गुहिल-वंश बप्पाच्या पूर्वींचा असून त्यांत इ. स. ६४६ चे शील व अपराजित राजे होते असें दिसतें. आणि त्याचा प्रारंभ गुहसेन अथवा गुहिल वलभी घराण्यांतील राजा यानें केलेला होता. तात्पर्य, चाटसुलेखांतील गुहिल वंशाशी गौरीशंकर मानतात त्याप्रमाणें आटपुरा लेखांतील गुहिलवंश अभिन्न नाहीं. ( पृ. २८३ )

याप्रमाणें शील व अपराजित यांच्या शिलालेखानें उत्पन्न होणाऱ्या अडचणीचा परिहार आहे. आतां दुसरी जी अडचण उपस्थित होते ती अशी कीं, जर गुहदत्त हाच बप्पा मानला तर आटपुरालेखांत दिलेल्या वंशावळींतील राजांच्या पिढीची सरासरी थोडी पडते. बप्पानें इ. स. ७६३ त राज्यत्याग केला हें आपण ठरविलें आहे. यापुढील वंशावळींतील शील व अपराजित हे पूर्वींच्या शील व अपराजिताहून भिन्न ठरविले तर ज्यांचे शिलालेख सांपडले आहेत असे राजे म्हटले म्हणजे प्रथम भर्तृपट्ट दुसरा, लेख वि. सं. १००० इ. स. ९४३, हा सोळाव्या पिढींतील राजा येतो. तेव्हां १५ पिढ्यांना १८० वर्षांचें अन्तर पडतें. म्हणजे सरासरी दर पिढीस १२ वर्षांची येते. ही फार कमी आहे, म्हणून डी. आर. भांडारकरांनीं बप्पा म्हणजे कालभोजाचाहि पुत्र खोम्माण पहिला ठरविला आहे. यानें पिढीस सरासरी २०।२२ वर्षें पडतात. पण साधारणतः ठरलेली सरासरी यावी म्हणून स्पष्टपणें दिलेली वंशावळ उलथीपालथी करणें कधींहि योग्य होणार नाहीं. कारण प्रथम तर आपण याच वंशावळींत पाहतों कीं, भर्तृपट्ट दुसरा ( वि. सं. १०००) च्या नंतरच्या चार पांच पिढ्यांना १२ हूनहि कमी सरासरी

पडते. शक्तिकुमाराचा शिलालेख १०३८ वि. सं. चा सांपडला आहे. ३८ वर्षांत चार पिढया आटपुरालेखांतच दरम्यान दिल्या आहेत म्हणजे दर पिढीस ९ च वर्षें पडतात. दुसरेपक्षीं कालभोज यास जर आपण बप्पा मानलें आणि शील त्याचा पूर्वज६४६इ. स. शिलालेखाचा मानला तर बप्पाचा राज्यारोहणकाळ इ. स. ७३० ठरला आहे, तेव्हां मागें शीलापर्यंत ३ च राजे राहतात आणि त्यांचा काळ ८६ वर्षें धरावा लागतो म्हणजे दर पिढीस २९ वर्षें धरावीं लागतात. गौरीशंकर ओझा यांच्यामतें हें असंभवनीय नाहीं; कारण अर्वाचीन इतिहासांत अकबर, जहांगीर, शहाजहान,औरंगजेब असे चार राजे लागोपाठ पुष्कळ वर्षें राज्य करणारे आहेत. पण यावर आमचें उत्तर असें कीं, लागोपाठ दीर्घकाळ राज्य करणारे राजे इतिहासांत सांपडतात तर लागोपाठ थोडींच वर्षेंहि राज्य करणारे राजे सांपडतात. उदाहरणार्थ पेशव्यांनीं सुमारें शंभर वर्षें राज्य केलें आणि तितक्या अवधींत ७ पिढया झाल्या (१ बाळाजी, २ बाजीराव, ३ नानासाहेब, ४ माधवराव, ५ नारायणराव, ६ सवाईमाधवराव, ७ बाजीराव दु. शिवाय मध्यंतरी रघुनाथराव व अमृतराव यांची लुडबुड झालीच ) ; आणि सरासरी १४ वर्षांची पिढी पडते. तात्पर्य, केवळ २० वर्षांची ठराविक सरासरी साधण्याकरितां शिलालेखांत सांगितलेल्या वंशावळीची दुसरें कोणतेंहि कारण नसतां उलथापालथ करणें अयोग्य आहे.

येथें अशी एक कल्पना पुढें येईल कीं, आटपुरा लेखाच्या पहिल्या श्लोकांतील गुहदत्त आम्ही म्हणतों त्याप्रमाणेंच गुहिलाहून भिन्न मानावा आणि, १ गुहदत्त २ गुहिल ३ भोज ४ महेन्द्र ५ नाग ६ शील अशी वंशावळ आटपुरा लेखांत दिली आहे, हा शील वि. सं. ७०३ इ. स. ६४६ च्या शिलालेखाचाच मानावा आणि त्याच्या पूर्वींच्या पांच पिढ्या २०।२१ वर्षांच्या धरल्या तर गुहदत्ताचा काळ १०० वर्षें पूर्वी म्हणजे ५४६च्या सुमाराचा येऊन तो वलभी राजवंशांतील गुहसेन ठरतो. किंबहुना कालभोज हाच बप्पा मानून गुहदत्तापासून कालभोजापर्यंतच्या पिढ्या घेतल्या तरी हाच निष्कर्ष उत्पन्न होतो. कारण कालभोज उर्फ बप्पाचा राज्यारोहणकाळ ७३४ इ. स. ठरला आहे त्याच्या पूर्वी आट-

पुरा लेखांत पिढ्या दिल्या आहेत त्या अशा १गुहदत्त २ गुहिल ३ भोज ४ महेन्द्र ५ नाग ६ शील ७ अपराजित ८ महेन्द्र दु. ८ पिढ्यांस २५ वर्षांची सरासरी लावली तर दोनसें वर्षें मागे जाता वलभीच्या गुहसेनाचाच काळ (इ. स. ५३९) येतो. हा निष्कर्ष एकदृष्टीनें आमच्या मतें अयोग्य नाहीं. कारण आटपुरा लेखानें ज्या वलभी राजापासून नागदा शाखा निघाली त्या राजाचा प्रथम उल्लेख करावा हें युक्तच आहे. परंतु रायबहादुर गौरीशंकर ओझा हे आटपुरा लेखांतील गुहदत्त हाच वलभीचा गुहसेन मानतात असें स्पष्ट दिसत नाहीं. त्यांच्या मतें कोणा एका अनिश्चित राजाचीं नाणीं आग्र्याजवळ सांपडलीं तो गुहदत्त होय. असो, गौरीशंकरांनीं नसलें तरी दुसऱ्या कोणीं गुहदत्त आणि वलभीचा गुहसेन एक असें प्रतिपादन केलें आणि ते जरी वरप्रमाणें युक्त असलें तरी आमच्या मतें आटपुरा व अबू चितोड लेखांना अभिन्नत्व धरून हें जमत नाहीं. कारण मग आटपुरा लेखांत बप्पाचा अलौकिक पराक्रम—मुसलमानांचा पराभव करून चितोडची गादी संपादन करणें—उल्लेखनीय असून उपेक्षित होतो. कारण कालभोज याच्या नामोच्चाराच्या वेळीं तरी कांहीं उल्लेख असावयास पाहिजे होता. प्रथम श्लोकांतील जयकार गुहसेनाच्या वाट्यांस गेला. मध्यंतरी कोठेंच नुसता उल्लेखहि नाहीं. वि. सं. १०३८च्या शिलालेखांत बप्पाच्या पराक्रमचा किंबहुना नांवाचा सुद्धा उल्लेख नसणें असंभवनीय आहे. ६ वर्षांपूर्वीच्याच नरवाहनाच्या लेखांत बप्पाचें नांवहि आहे आणि त्याच्या मोठेपणाचा गौरवहि योग्यप्रकारें आहे (गुहिलगोत्रनरेन्द्रचन्द्रः). दुसरी गोष्ट अशी कीं, आनन्दपुरविनिर्गत हें विशेषण गुहसेनास लागत नाहीं. वलभीचेंहि नांव आनन्दपुर होतें असें अद्याप प्रसिद्ध नाहीं. आनन्दपुर हें कित्येक शहरांचें नांव आहे हें खरें आणि हल्ली विशेषतः वडनगरचें आहे आणि कदाचित गुहदत्त ब्राह्मण असता तर आनन्दपुरचा महीदेव म्हणजे एक वडनगरचा ब्राह्मण हें म्हणणें जुळलें असतें. परंतु हें आम्हीं पूर्वी निश्चित केलें आहे कीं, गुहदत्त हा ब्राह्मण नसून वडनगरचाहि नव्हता. कारण अबू चितोड लेखांत आनंदपुर म्हणजे नागदा असें स्पष्ट आहे. तेव्हां 'आनंदपुरविनिर्गत' 'नागदयाहून आलेला' हें

विशेषण बप्पालाच लागू शकतें. तो मुळांत नागह्याचा असून त्यानें चितोडास गुहिलवंश स्थापिला. डॉक्टर डी. आर. भांडारकर यांनीं आपल्या नेहमींच्या संवयप्रिमाणें 'तद्' शद्ब चितोडगड लेखांतील वाक्याचें भाषान्तर देतांना गाळला आहे. 'जीयादानन्दपूर्वं तदिहपुरमिलाखण्ड सौंदर्यशोभि' याचें भाषान्तर देतांना (बंगाल आर. ए. एस न्यूसीरीज-व्हा. ५ पृ. ७०) नुसतें "May Anandpur be victorious which shines &c" असें म्हटलें आहे. वास्तविक May that Anandpur असें म्हणावयास पाहिजे होतें. अर्थात तें म्हणजे पूर्व श्लोकांत वर्णिलेलें नागन्हद होय. चितोड लेखांतील या श्लोकावरून स्पष्ट आहे कीं, (भावन. इं. पा. ७४–७५) बप्पाख्य विप्र आनंदपुर म्हणजे नागन्हद येथील राहणारा होता. तात्पर्य बप्पाचा मूळगांव आनंदपूर म्हणजे नागन्हद होता हें चितोड लेखांत आणि आटपुरा लेखांतहि स्पष्ट आहे. आणि नागन्हदाचें नांव आनंदपुरीहि आहे हें प्रसिद्ध आहे. तेव्हां आमचें म्हणणें असें कीं आनंदपुरविनिर्गत हें आटपुरा लेखांतील विशेषण गुहसेनाला लागणार नाहीं. तें बप्पासच लागू पडतें. कारण तो तेथून येऊन चितोड जिंकून तेथें स्थापित झाला. विनिर्गत शब्दाचा हाच अर्थ असतो कीं, तो मनुष्य एके ठिकाणचा राहणरा असून दुसऱ्या ठिकाणीं जातो. याचप्रमाणें "विप्रकुलनन्दनः" हें विशेषण बप्पाला योग्य रीतीनें लागतें. ह्या शब्दाचा उपयोग अनुप्रास (आनंदपूर व आनंदन) साधण्याकरितां केला आहे हें खरें तरी त्यांत कांहीं स्वारस्य असलेंच पाहिजे. अर्थात् बप्पाची अत्यंत ब्राह्मणभक्ति व हारितराशि योग्याची सेवा याचा यांत निर्देश दिसतो. आमच्या मतें सर्व ओळ बप्पाला पूर्णपणें लागू पडते. आणि आटपुरा लेखांत सबंध मेवाड घराण्याची वंशावळ दिली असून त्यांत बप्पाचा नामनिर्देश किंवा त्याच्या पराक्रमाचा व मोठेपणाचा मागमूसहि नसावा हे संभवनीय नसल्यानें या श्लोकपूर्वार्धांत बप्पाचाच उल्लेख आहे असें दिसतें. तात्पर्य नरवाहन लेख आणि अबूचितोड लेख यांची सांगड आटपुरा लेखांशीं घालतां पहिल्या श्लोकांत वंशसंस्थापक बप्पा याचाच जयजयकार असून गुहदत्त शब्दानें बप्पाचाच निर्देश आहे असें निश्चित वाटतें.

शेवटीं गुहदत्त हें नांव बप्पाकरितां या श्लोकांत कसें योजिलें असावें याचा आपण विचार करूं. बप्पा हें त्याचें मूळचें नांव असून वंशसंस्थापक या नात्यानें 'पिता' अर्थानें दिलेलें नाहीं असें आम्ही या भागांत (पृ. ११७-८) म्हटलें आहे. आतां एकंदर वंशपूर्वपीठिकेप्रमाणें त्याला दुसरें नांव असणें शक्य आहे; आणि तें नांव गुहदत्त असून तें पूर्व पीठिकेचा संबंध दाखविण्यासाठीं आटपुरा लेखांत दिलें असावें. आमच्या सिद्धांताप्रमाणें वलभी राजघराण्याची एक शाखा नागदा येथें स्थापित झालेली असून त्यांत बप्पाचा जन्म झाला. पूर्वीं निर्देश केलेल्या रायसागर शिलालेखांत असें म्हटलें आहे कीं या शाखेंतील राजे आदित्यउपपदान्त नांव घेत होते. हीं नांवें त्या लेखांत येणेंप्रमाणें चौदा दिलीं आहेत. १ पद्मादित्य २ शिवादित्य ३ हरदत्त ४ सुजसादित्य ५ सुमुखादित्य ६ सोमदत्त ७ शीलदित्य ८ केशवादित्य ९ नागादित्य १० भोगादित्य ११ देवादित्य १२ आसादित्य १३ कालभोजादित्य १४ गूहादित्य (भाव. इं. पृ. १५०). हा लेख सतराव्या शतकांतील असून पुष्कळ नांवें आठवणींतून गेल्यामुळें कल्पिलेलीं दिसतात. पण यांत एक नांव शीलादित्य आहे आणि त्याचाच वि. सं. ७०३ चा शिलालेख असावा. प्रो. रि. वेस्टर्न सर्कल १९०९ मध्यें पृ. ४८ वर जो लेख उल्लेखित आहे (भांडारकर डी. आर. इं. ॲ. भा. ३९) तो शीलादित्याचा आहे नुसत्या शीलाचा नाहीं. येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, वलभीपासून शाखा निघाल्यावर १४ पिढ्या आदित्य उपपद राहिलें आणि बप्पानें जेव्हां दुसरा वंश सुरू केला तेव्हां आदित्य उपपद बंद झालें अशी कथापरंपरा मेवाडची आहे आणि तदनुरूप आटपुरा लेखांत कोणतेंहि नांव आदित्यान्त नाहीं. याकरितां या लेखांत आलेला शील निराळा आणि ७०३ च्या शिलालेखाचा शीलादित्य निराळा असें आम्ही म्हणतों. पण आम्हांस येथें मुख्य गोष्ट सांगावयाची ती ही कीं १४ नांवांतील शेवटचें नांव गुहादित्य आहे. दुसरें असेंहि या रायसागर लेखांत दिसतें कीं एक दोन ठिकाणीं आदित्याचे ऐवजीं नुसतें दत्तपद येतें, व तें उच्चार सौकर्यार्थ. तेव्हां आटपुरा लेखांतील गुहदत्त हें पद गुहादित्याऐवजीं असावें आणि तें श्लोकाच्या वृत्तमर्यादेसाठीं योजिलें आहे. बप्पा हा

या आदित्यान्त नांवाच्या नागदा राजांपैकीं शेवटचा राजा होता. त्यानें चितोड येथें आपला वंश स्थापन करून एका अतिशय वीर्यशाली प्रसिद्ध वंशाचा तो स्थापक झाला. आणि त्या वंशाला त्याच्या गुहिल पुत्रावरून गुहिलोत ही नवी प्रथा प्राप्त झाली. आटपुरा लेखांतील या वादग्रस्त पहिल्या श्लोकाचा अर्थ आम्ही याप्रमाणें लावतों. आणि रायबहादूर गौरीशंकर ओझा यांच्या मताशीं या बाबतींत आमचा विरोध असल्यानें आम्ही तो वाचकांपुढें कांहिंसे भीतभीत मांडीत आहों. शेवटीं आम्हांस पुन्हां हें सांगावयाचें आहे कीं, आटपुरा लेखाचा (वि. सं. १०३८) अर्थ अबू व चितोडगड लेखानुरूप ( वि. सं. १३३२ व ४१ ) च लावला पाहिजे. आणि याच लेखांची पुनरुक्ति बाणपुरा लेखांत ( वि. सं. १४९८ ) झाली आहे. या तीन लेखांत वंशावळ येणेंप्रमाणें आहे. १ श्रीबप्पा २ श्री गुहिल ३ भोज ४ महेन्द्र ५ शील ६ कालभोज ७ भर्तृपट्ट ८ सिंह वगैरे. या अर्वाचीन लेखात जर थोडासा वंशावळींत बदल झाला असेल तर तो पूर्वींच्या लेखावरून दुरुस्त करून घ्यावा म्हणजे झालें. शिला लेखांना पूर्वप्रामाण्याचा नियम लागलाच पाहिजे. पण अलीकडचे लेख पूर्व लेखांनीं विरोधित झाले नसल्यास मानण्यायोग्य समजलेच पाहिजेत. यासाठीं अबू, चितोडगड व बाणपुरा लेखांस झुगारून किंबहुना आटपुरा लेखासिहि सोडून बप्पा म्हणजे कालभोज किंवा खुम्माण हें मानण्यास आम्ही तयार नाहीं; आणि म्हणून आटपुरा लेखांत दिलेल्या विस्तृत वंशावळीच्या आरंभीं आम्ही बप्पा यास ठेवितों.

---

# परिशिष्ट नं. ७

## अलीकडील ऐतिहासिक शोध व त्यांवरून या काळच्या इतिहासासंबंधें मिळणारी माहिती.

### १ कनोजचें प्रतिहार घराणें.

रायबहादुर गौरीशंकर ओझा यानीं नुकताच एक प्रतिहार घराण्याचा नवीन शिलालेख प्रसिद्ध केला आहे. त्यावरून प्रतिहार घराण्याच्या वंशावळींत आणखी एका राजाची भर पडते. यांचें नांव महेंद्रपाल दुसरा असें दिसतें ( प्रतापगड शिलालेख एपि. इं. भाग १४ पृ. १८२ ). या लेखाची मिति १००३ असा आंकडा पंडित गौरीशंकर वाचतात, म्हणजे हा विक्रमसंवत् मानून याचा काळ इ. स. ९४६ ठरतो. यांत सर्व वंशावळीचा उच्चार महाराजा देवशक्ति यापासून असून प्रत्येक राजाच्या मातुश्रीचेंहि नांव दिलें आहे व प्रत्येकाची उपास्यदेवताहि सांगितली आहे. ही गोष्ट प्रतिहारांच्या लेखांच्या ठरलेल्या वहिवाटी-प्रमाणें आहे. सम्राट प्रतिहार घराण्याची जी वंशावळ आम्हीं पृष्ठ १८१ वर दिली आहे त्यांत हा महेन्द्रपाल दुसरा दिलेला नाहीं. यानेंच हा प्रतापगड दानलेख केलेला असून त्यांत त्यास विनायकपालाचा पुत्र म्हणलें आहे. आतां खजुराहोचा शिलालेख ( एपि. इं. भा. १ ) हेरंब-पालाचा पुत्र हयपति देवापाल याचा उल्लेख करितो, आणि सियाडोनी शिलालेख ( एपि. इं. भा. १ ) हि क्षितिपालपादानुध्यातदेवपाल याचा वि. सं. १००५ म्हणजे इ. स. ९४८ त उल्लेख करितो. हे दोन्ही देवपाल एकच होत असें मानलें गेलें आहे ( म्हणजे देवपालाचा पिता क्षितिपाल याचेंच नांव हेरंबपाल होतें असेंहि मानलें गेलें आहे ). परंतु गौरीशंकर ओझा यांचें असें मत आहे कीं, हे दोन्ही देवपाल एक नसून भिन्न आहेत, कारण हयपति हें प्रतिहार सम्राटांचें बिरुद असल्याचें दिसत नाहीं. तथापि या मुद्यासंबंधें आमचें मत असें आहे कीं, हयपति ह्या शब्दानें प्रतिहार कनोज राजांचाच बोध होतो. आरब प्रवाशांच्या वर्णनावरून कनोजचे प्रतिहार अश्वदलाबद्दल प्रसिद्ध होते हें आम्हीं दाखविलेंच आहे (पृ. २६४ पहा ). त्याचप्रमाणें परिशिष्ट ३ मध्यें दिलेल्या शिलाहारांच्या नवीन शिलालेखांत वाजीश हा शब्द स्पष्टपणें

कनोजच्या प्रतिहारांस उद्देशून लिहिलेला आहे (पृ. ४४९ ). तेव्हां जरी कनोजच्या प्रतिहारांनीं स्पष्टपणें हें बिरुद धारण केलेलें नसलें किंवा त्यांनीं आपल्या लेखांत तें घेतलेलें नसलें तरी इतर राष्ट्रें व त्यांतील लेख यांनीं त्यास हयपति म्हटलेलें आहे. ज्याप्रमाणें प्रतिहार यांनीं आपल्या लेखांत आपल्यास गुर्जर म्हटलेलें नाहीं तरी राष्ट्रकूट व आरब लेखक त्यांस गुजर म्हणत, त्याचप्रमाणें हा हयपति शब्द त्यांस इतरांनीं लावलेला दिसतो. तेव्हां परकीय राष्ट्राच्या या खजुराहो लेखांतील हेरंबपाल पुत्र हयपति देवपाल हा कनोजप्रतिहार देवपालच होय असें निश्चयानें म्हणतां येतें व त्यापासूनच यशोवर्म्यानें वैकुण्ठाची ( विष्णूची ) मूर्ति मिळविली, आणि सियाडोनी लेख हा प्रतिहाराच्या लेखांपैकीं असल्यानें त्यांत नुसता क्षितिपाल पादानुध्यात देवपाल असा त्याचाच उल्लेख आहे. हे दोन देवपाळ भिन्न समजून पंडित गौरीशंकर ओझा जी वंशावळ देतात ती देण्याची अवश्यकता वाटत नाहीं. पण दोन्ही देवपाल एक असें मानून त्यांनीं जी वंशावळ नवी दिली आहे ती येथें देणें जरूर आहे. ती येणेप्रमाणें:—

८ महेंद्रपाल पहिला

( ९०३ व ९०७ इ. स. लेख )



रायबहादुर गौरीशंकर ओझा यांनीं दिलेल्या वरील वंशावळीसंबंधीं आम्ही वाचकांसमोर आमच्या दोन कल्पना सांगतों. हें शक्य आहे कीं, महेंद्रपाल हें देवपालाचेंच अन्य नाम असेल. त्याचा ९४६ हा काळ ९४८ ह्याला अगदीं जवळ आहे आणि महेंद्र हें देवाचेंच एक विशिष्ट अन्यस्वरूप आहे. दुसरी गोष्ट एक अडचण अशी दिसते कीं वर उल्लेखिलेला खजुराहो शिलालेख हा इ. स. ९५४ चा असून त्याच्या शेवटीं "विनायकपालाच्या कारकीर्दींत" असे शब्द आहेत; व त्यावरून आम्ही असा निष्कर्ष काढला आहे कीं, इ. स. ९५४ पर्यंत चन्देल्ल हे नामधारी प्रतिहार सम्राटांचें साम्राज्य कबूल करीत होते. तेथपर्यंत विनायकपाल जिवंत होता असें मानावें लागते. पण विनायकपाल उर्फ महीपाल हा यावेळीं मयत असून त्याचा पुत्र देवपाल याचा उल्लेख इ स. ९४८ च्या सियाडोनी लेखांत आलेला आहे. आतां इ. स. ९५५ त जिवंत असलेला विनायकपाल दुसरा एखादा गृहीत धरला आणि त्याचा पडता अम्मल, मरण्यास टेकलेल्या मोगल बादशाहीचा अंमल जसा मराठे किंवा इंग्रज मानीत त्याप्रमाणें, चन्देल्ल मानीत होते असें धरलें तर वंशावळ पुन्हा दुरुस्त करून असें मानावें लागेल कीं, देवपाल यास विनायकपाल नांवाचा पुत्र होता; तो थोडीं वर्षें राज्यावर असून त्याचा क्रमांक १३ धरून त्याच्या पश्चात् त्याचा चुलता विजयपाल १४ गादीवर बसला. याचा काळ निश्चित इ. स. ९६० मथनदेवाच्या राजोर शिलालेखावरून ठरला आहे ( एपि इं. भा. ३ ). आजाचें नांव नातवास देण्याची परिपाटी सर्वत्र असून प्रतिहार वंशावळींतहि दिसते आणि त्याप्रमाणें विनायकपाल—पुत्र देवपाल याचा पुत्र विनायकपाल ओघानेंच येतो. तथापि आणखी शोधांती अधिक प्रकाश या मुद्यांवर पडे पावेतों गौरीशंकर यांनीं सुचवलेली वंशावळीची दुरुस्ती मान्य करावी असें आमचें मत आहे.

हें आणखी सांगणें महत्त्वाचें आहे कीं, या नवीन प्रसिद्ध झालेल्या दानलेखावर महेन्द्रपाल दुसरा यानें सही श्रीविदग्ध किंवा नुसती विदग्ध अशी केली आहे. कदाचित् या बिरुदानें त्याचे देवपालाशीं एकत्व किंवा भिन्नत्व भविष्यकाळीं सिद्ध होईल. देवपालाचा प्रत्यक्ष

लेख अद्याप सांपडलेला नाहीं. प्रतिहारांच्या लेखांची यादी स्मिथनें ( जे. आर. ए. एस १९०९ पृ. ३३ ) दिली आहे त्यांत देवपालाचा उल्लेख सियाडोनी व खजुराहो या दोन लेखांवरून दिला आहे. देवपालाच्या सहीचा लेख सांपडेल तर प्रतिहार सम्राटांच्या पद्धतीप्रमाणें सहीकरितां त्यानें कोणतें बिरुद धारण केलें होतें हें समजेल. असा लेख सांपडेपर्यंत हा विषय अनिर्णितच राहील.

## २ परमारघराणें.

वर उल्लेखिलेला प्रतापगड शिलालेख ( ए. इं. भा. १४ ) आणखी एक प्रश्न उपस्थित करतो आणि तो धारच्या परमारांविषयीं. बहुधा प्रतापगड येथेंच एका चाहमान मांडलिक इंद्रराजनामक राजानें सूर्यमंदिर बांधलें त्यास त्याच्या विनन्तीवरून श्रीविदग्ध साम्राटाच्या म्हणजे महेंद्रपाल दुसरा याच्या महासामन्त व महादण्डनायक अधिकाऱ्यानें, दामोदरपुत्र माधवनामकानें, एक गांव दान दिला आणि हें दान उज्जनी येथें झालें असून दानलेखावर माधव आणि श्रीविदग्ध ह्या दोघांचीहि सही आहे असें या प्रतापगड लेखावरून दिसतें. या दानाची मिति दिलेली नाहीं, परंतु ती वर उल्लेखिलेल्या गोष्टीच्या इ. स. ९४६ ( १००३ वि. सं. ) मिती जवळच असली पाहिजे. यावरून असें दिसतें कीं, ९४६ इ. स. पर्यंत माळवा, उज्जनी राजधानीसह, कनोजच्या साम्राटांच्या अमलाखालीं होता. पण आम्हीं परमारांच्या प्रकरणांत ( पृ. ७९६ ) असें म्हटलें आहे कीं, कृष्ण परमारानें आपली सत्ता माळव्यावर व उज्जनी येथें ९१० च्या सुमारास प्रस्थापित केली होती. तेव्हां कनोज साम्राट प्रतिहारांचा प्रतिनिधि माधव हा उज्जनी येथें इ. स. ९४६ सांत कसा येऊं शकेल ? यावरून एक गोष्ट निश्चित होते कीं, आम्ही जें म्हटलें आहे कीं परमारांचा अम्मल माळव्यावर कृष्णराजापूर्वीं स्थापन झाला नव्हता तें योग्य आहे. परंतु या प्रतापगड लेखावरून असें आणखी मानावें लागतें कीं इ. स. ९१० चा कृष्णराज परमार हा सुद्धां माळव्यांत अद्याप स्वतंत्र झाला नव्हता. निदान तो प्रत्यक्षतः मालक झाला असला तरी पूर्व वहिवाटीस अनुसरून कनोजच्या सम्राटांचा एखादा अम्मलदार उज्जनीस येऊं देत होता. मोडत्या साम्राज्याजे असे अम्मलदार कांहीं काळपावेतों चालतात असें आपणास

इतिहासावरून दिसतें. लोकांच्या समाधानासाठीं हें सोंग कांहीं दिवस बंगालच्या दिवाणीप्रमाणें ठेवावें लागतें. इंग्रजांनीं बंगाल प्रत्यक्ष काबीज केला तरी त्याच्या दिवाणीचा मक्ता मरत्यामोंगल साम्राज्यापासून कांहीं दिवस त्यांनीं घेतला आणि लोकांचें मन हळुहळू बदलल्यानंतरच मोगल सत्ता उघडपणें झुगारून दिली.

## ३ राष्ट्रकूट घराणें.

एपि. ई. भा. १४ पान १२५ वर राष्ट्रकूटांचा एक नवीन लेख प्रसिद्ध झाला असून त्यांत डा. डी. आर. भांडारकर यांच्या मताच्या आधारें रा. सुखठाणकर लिहितात कीं, "कृष्णाचा दंतिदुर्गाच्या मागें राज्यावर येण्याचा प्रकार सरळ वारसाच्या मार्गाचा होता; बडोदा दानलेखावरून डाक्तर फ्लीट यांनीं अनुमान केल्याप्रमाणें दन्तिदुर्गाचा काटा काढून टाकण्याचा नव्हता." या भागांत पृ. २३९ वर कृष्णावरील या अपवादाचा आम्हीं उल्लेख केला असून दन्तिदुर्गाचा कृष्णानें वध करून राज्यारोहण केलें असेंच मत आम्हीं दिलें आहे व एकाच दानलेखांत हें विधान असले तरी तें मान्य करण्याजोगें आहे असें म्हटलें आहे. हा नवीन दानलेख कृष्णाचाच असून शके ६९४ म्ह. इ. स. ७७२ चा आहे. तो प्रसिद्ध करतांना रा. सुखठाणकर म्हणतात "ज्या अर्थीं कृष्ण स्वतः दन्तिदुर्गाविषयीं कोणताहि वाईट उल्लेख करीत नाहीं, त्याअर्थीं तो वाईट मार्गास पुढें लागल्यानें कृष्णानें त्याचें उन्मूलन करून स्वतः राज्यारोहण केलें ही गोष्ट भरंवशालायक नाहीं." यासंबंधीं निरनिराळ्या लेखांचें परीक्षण करितां ही गोष्ट थोडासा फरक करून सत्य मानावी असें आमचें मत आहे. या गोष्टीचा उल्लेख यानंतर ४० वर्षांनींच झालेल्या इ. स. ८१२ च्या बडोदा दानलेखांत असून तो लेख अगदींच बाजूस सारतां येणार नाहीं. कृष्णानंतर इतक्या थोड्या अवधीनेंच ह्याविषयीं खोटें विधान बडोदा लेखांत येण्याचें कांहींच कारण नाहीं. साधारणपणें अशा प्राचीन लेखांतील कोणतेंहि विधान सत्यच मानलें पाहिजे, मात्र खोटा समज होण्याचें कांहीं योग्य कारण असल्यास गोष्ट निराळी. आतां या विधानाचा उच्चार पुढील काळाच्या लेखांत येत नाहीं याचें सरळ कारण हें कीं, या गोष्टीचा विसर पडला असावा

किंवा औचित्य दृष्टया अशा अप्रासंगिक गोष्टींचा उल्लेख करणें अनवश्यक समजलें गेलें असावें. तसेंच करडा दानलेखांत ( इ. स. ९७२ ) दोनशें वर्षांनन्तर दन्तिदुर्गाला पुत्र नव्हता म्हणून त्याचा चुलता कृष्ण गादीवर बसला असें चुकीचें विधान येणें शक्य आहे. कारण इतक्या काळानंतर कृष्णाचें राज्यारोहण कसें झालें तो प्रकार विसरला गेला असावा.

यासाठीं सर्व लेखांची संगति जुळविण्यास थोडीशी अशी दुरुस्ती ऐतिह्यांत सुचवितो कीं, दन्तिदुर्ग कालगत्या मेल्यावर त्याचा पुत्र दुर्वृत्त असल्यामुळें चुलत आजा कृष्ण यानें त्यास बाजूस सारून स्वतः राज्यारोहण केलें. बडोदा दानलेखांतील शब्द थोडेसे सामान्य असून त्यांत या ऐतिह्याचाहि समावेश होईल. ते शब्द असे, “यो वंश्यमुन्मूल्य विमार्गभाजं राज्यं स्वयं गोत्रहिताय चक्रे” यांत वंश्य असा सामान्य शब्द असून त्यांत दन्तिदुर्गाच्या पुत्राचाहि समावेश होईल. किंबहुना या विधानांत एक राजकीय तत्वहि सूचित केलेलें आहे कीं, राज्याचा योग्य वारस जर दुर्वर्तनानें राज्यावर बसण्यास अयोग्य असेल तर गोत्रहिताकरितां पुढच्या वारसानें त्यास जरूर बाजूस सारावें. हाच प्रकार या राष्ट्रकूट घरण्यांत पुढच्याच पिढीला झालेला दिसतो. कारण पुढील दानलेखांत असें वर्णन आहे कीं, कृष्णाचा वडील पुत्र गोविंद हा कामसुखांत दंग असल्यानें त्याचा धाकटा भाऊ ध्रुव यानें त्यास बाजूस सारलें ( देवळी दानलेख पहा. ) किंबहूना पैठण लेखांत ( एपि. इं. भा. ३ पृ. १६७ ) असें सांगितलें आहे कीं, गोविंद यास कांची, गंग, वेंगी व मालव यांनीं मदत केली तरी ध्रुवानें बधु गोविंदाचा पराभव केला. राजकारणाचा नेहमींचा मार्गहि यावरून त्यावेळीं चालू असलेला दिसतो, आणि भावाभावांच्या तंट्यांत शेजारचे राजे मध्यें घुसायची संधि त्यावेळींहि पाहात असें दिसतें. पण या दोन प्रसंगांवरून हेंहि दिसतें कीं, या काळांत पुढें आलेले रजपूत नीतिमत्तेनें खंबीर होते आणि लोकहि जो शुद्धाचरणी व तेजस्वी राजा असेल त्याच्याच बाजूला होत. असो, आमचें मत असें आहे कीं, या नवीन लेखावरून दन्तिदुर्ग स्वतः पुढें दुर्वृत्त निघाला किंवा त्याचेंच कृष्णानें उन्मूलन केलें असें नसून त्याच्या

मुलाची ही स्थिति व अवस्था झाली असें बडोदा दानलेखाशीं इतर लेखांचा मेळ घालतां मानतां येईल. *

## ४ बंगालचें पाल घराणें

श्रीयुत बॅनर्जी यांनीं विग्रहपाल तिसरा याचा आमगाच्छी लेख पुन्हां प्रसिद्ध केला आहे. कित्येक वर्षांपूर्वीं डॉक्टर किलहार्न यांनीं तो अर्धा प्रसिद्ध केला होता. हल्लींच्या प्रसिद्ध केलेल्या प्रतींत ( एपि. इं. भा. १५ पा. २९५ ) आम्हीं दिलेली पूर्व प्रसिद्ध असलेलीच वंशावळ दिलेली असून एक नवीन राजा जयपाळ मात्र अधिक आहे. हा जयपाळ धर्मपालाचा बंधु वाक्पाल याचा पुत्र होता असें म्हटलें आहे ( या भागांत पृ. २३६ वर दिलेली वंशावळ पहावी ) त्याचा पुत्र विग्रहपाल पहिला हा होता. येथून पुढची वंशावळ कायमच आहे. आणखी सांगण्यासारखी गोष्ट ही कीं, या दानलेखाचा कर्ता विग्रहपाल तिसरा हा बौद्ध होता असें या लेखांत स्पष्ट म्हटलें आहे.

## ५ मलखेड

दक्षिणच्या राष्ट्रकूटांची राजधानी मान्यखेड म्हणजे मालखेड असें समजलें जातें. तें ठिकाण मीं स्वतः जाऊन पाहिलें. याचें खरें नांव मलखेड आहे ते चुकीनें या भागांत मालखेड दिलें आहे- " अमरपुरीशीं स्पर्धा करणारें मान्यखेट " असें राष्ट्रकूट लेखांत वर्णिलेलें असतें; पण अशा विस्तीर्ण पुरीचा ठिकाणावर कांहींच मागमूस नाहीं; आणि माझ्या मतें येथें एखादे मोठें शहर वसूं शकत नाहीं. कारण मलखेडाच्या बाजूनें

---

* राष्ट्रकूटांचे दानलेख कालानुक्रमें पुढें दिल्याप्रमाणें आहेत. १ हल्लीं प्रसिद्ध झालेला भांडक दानलेख कृष्ण पहिला याचा इ.स. ७७२ ( एपि. इं. १४ ). २ पैठण लेख इ. स. ७९४ ( एपि. इं. भा. ३ पृ. १६७). ३ बडोदा लेख इ. स. ८१२ ( इं. ॲ. भा. १२ पृ. १८२ ) ४ बगुम्रालेख इ. स. ८६७ ( इं. ॲ. १२ पा. १८७ ). ५ अलास लेख गोविंद तिसरा यांचा ( एपि. इं. ६ पा. २०९ ) व सामनगड लेख ( सदर ) इ. स. व ७ करडा लेख ( इं ॲ. १२ पा. २६७ ) इ. स. ९७२ वगैरे.

वाहणारी कांगिणी नदी उन्हाळ्यांत आटते आणि मलखेडांत तर पाणी नाहीं म्हणजे येथें विहिरी पडूं शकत नाहींत, कारण जमीन पथरोटीची आहे आणि फत्तर लवकरच लागतो तो खोलहि आहे. एक गोष्ट मात्र अनुकूल दिसते; ती ही कीं, येथें कांगिणी नदीला एक ओढा मिळतो त्या बेचगळ्यांत बराच उंच व ऐसपैस उंचवटा असून त्याजवर एक विस्तीर्ण किल्ला हल्लींहि आहे. आणि प्राचीन काळीं जेव्हां तोफा नव्हत्या तेव्हां या सभोंवारच्या सपाट प्रदेशावर या किल्ल्यांतून अम्मल चालविणें सोईचें होतें. पण असें म्हणतात कीं, हा हल्लींचा किल्ला मुजफर नांवाच्या एका मुसलमान सरदारानें बांधला आहे व त्यास मुजफरकिल्ला असेंच नांव आहे. किल्ला फार विस्तीर्ण आहे आणि हल्लींचा मुसलमान जहागीरदार किल्ल्यांत राहतो. परंतु आंतील जागा विस्तीर्ण असून सुमारें ५००० पर्यंत तेथें वस्ती राहूं शकेल. किल्ल्याच आंत सर्वभर पडलेल्या घरांचे पत्थर पसरलेले आहेत. त्यांत एका जैन मंदिराचा अवशेष व एक वैष्णव लहानसा ओसाड मठ अद्याप आहे. हा मठ सूमारें १३ व्या शतकांतला आहे. दन्तकथा अशी सांगतात कीं, मुजफरानें हा किल्ला एका जैन सरदारापासून युक्तीनें काबीज केला. तेव्हां असें दिसतें कीं, येथें पूर्वीं किल्ला होता आणि मुजफरानें तो दुरुस्त केला. तो जुना किल्ला राष्ट्रकूटानीं एक मजबूत जागा म्हणून आपली राजधानी केली असेल. ज्याप्रमाणें शिवाजीनें रायगड किल्ला आपली राजधानी केली आणि रायगडच्या बाहेर कांहीं मोठें शहर असणें संभवनीय नव्हतें तशीच कर्नाटकाच्या नाक्यावर मजबूत जागा पाहून विस्तीर्ण नगर नसतांहि राष्ट्रकूटांनीं ही राजधानी ठरविली असेल. प्राचीनकाळीं मजबूत किल्ला हेंच राजधानीचें मुख्य अंग होतें. शहराची अवश्य..ता नव्हती. अरबी प्रवाशांनीं लिहिलें आहे कीं, मान्यखेट डोंगरांनीं वेष्टित आहे. पण हें वर्णन मलखेडास बिलकुल लागूं नाहीं हें खरें. कारण हें गांव अगदीं सपाट प्रदेशांत वसलें आहे. तथापि डोंगर हा भाषांतरातला शब्द चुकला असून मूळ आरबींत पथराळ जमीन असा शब्द असेल तर तें वर्णन मलखेडला तंतोतंत लागतें. कारण घोडदळाच्या हालचालीला किल्ल्याच्या बाहेर अगदीं जागा नाहीं. किल्ल्यावर हल्ला पायदळानेंच होईल आणि किल्ल्याचें रक्षणहि पाय-

ळच करूं शकेल. सर्व गोष्टींचा विचार करतां राष्ट्रकूटांचे मान्यखेट म्हणजे मलखेड ही कल्पना अद्याप संशयित आहे.

हें सांगणें येथें अवश्य आहे कीं, मलखेड हें वैष्णवांचें एक पवित्र स्थान आहे. किल्ल्यांत वैष्णवांचा पूर्वीं मठ होता तो सोडून वैष्णव गुरु टीकास्वामी ( यांनीं मध्वाचार्यांच्या ग्रंथावर टीका केली आहे ) गांवाबाहेर मैलावर कांगिणी नदीच्या कांठीं जाऊन राहिले तेथें त्यांचें हल्लीं वृन्दावन आहे व तेथेंच दरसाल यात्रा भरते. किल्ल्यांत जैनांचें देवालयाचा अवशेष आहे व गांवांतहि एक जुनें जैन मंदिर आहे. यावरून पूर्वीं येथें राज्य दिसतें; तें कोणा राष्ट्रकूट सरदाराचें असावें. राष्ट्रकूटांचा ओढा पुढें जैनांकडे होता हें प्रसिद्ध आहे. किल्ल्यांत जुने जैन व वैष्णवयांचे ठिकाण आहे, यावरून हें ठिकाण पूर्वींहि राजकीय महत्त्वाचें असावें.

शेवटीं या काळासंबंधें व पुढील काळासंबंधें एक महत्त्वाचा प्रश्न उपस्थित करणारी गोष्ट आमच्या फिरतींत दृष्टोत्पत्तीस आली ती नमूद केली पाहिजे. गुलबर्गा जिल्हा निजामशाहींत असून त्यांत मलखेड आहे. व या जिल्ह्यांत बहुतेक लोक कानडी बोलतात. परंतु पाटील कुलकर्णी जमाखर्च मराठींत व मोडींत लिहितात इतकेंच नव्हे तर बाजारांतील व्यापारीसुद्धां कानडी बोलणारे असूनही आपले जमाखर्च मोडींत व मराठींत लिहितात याचें मला आश्चर्य वाटलें. हा परिपाठ कसा पडला याची ऐतिहासिकदृष्ट्या विचारपूस करतां विजापुरकरांचा अम्मल येथें होता तेव्हांपासून हा प्रघात आहे असें लोकांनीं सांगितलें. हा प्रघात याच कानडी जिल्ह्यांत आहे असें नसून बेळगांव धारवाड किंबहुना म्हैसूरपर्यंतच्या कानडी मुलखांत आहे असेंहि मला समजलें. या सर्व ठिकाणीं विजापुरकरांचें राज्य होतें ही गोष्ट खरी पण विजापुरच्या मुसलमान बादशाहांनीं तरी मराठींत जमाखर्च ठेवण्याची पद्धत कां ठेवावी? बहामनी बादशाहीचे तुकडे झाले ते बहुधा भाषावार प्रांताचे झाले असें स्पष्ट दिसतें. कानडी मुलखांत विजापुरची अदिलशाही, मराठी मुलखांत नगरची निजामशाही आणि तेलगणांत हैदराबादची ( गोवळकोंड्याची ) कुतुबशाही झाली हें स्पष्ट आहे. तेव्हां विजापुरचे बादशाहा यांचा संबंध महाराष्ट्राशीं नसून यांनीं कानडी मुलखांत मोडी मराठींत जमाखर्च ठेवण्याची पद्धति कां

चालवावी हें एक गूढ आहे. माझ्या मतें याचा छडा याच्याही पूर्वींपर्यंत जातो. बाहामनी राज्य प्रथमतः गुलबर्गा येथें राजधानी करून होतें आणि हें राज्य स्थापन करणारे बहुधा महाराष्ट्रांत प्रथम आलेले मुसलमान सरदार दौलताबाद येथें दिल्लीचा सुभा होता त्या ठिकाणचे असल्यानें त्यांच्या अमदानींत हा प्रघात सुरू झाला असेल. पण या मुसलमानांनासुद्धां कानडी प्रांतांत मराठी जमाखर्च सुरू करण्याचें तरी विशेष अगत्य कां असावें ? तेव्हां याच्याहि पलकिडे जाऊन हा प्रघात दौलताबाद म्हणजे देवगिरीच्या यादव घराण्याच्या राज्याच्या वेळीं पडला असावा. देवगिरीचे यादव हे पक्के मराठे आणि यांचा प्रसिद्ध कारभारी म्हणजे मुलकी अधिकारी हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत होता हें प्रसिद्ध आहे. यानेंच जमिनीच्या धाऱ्याचा बंदोबस्त केला आणि मोडी मराठी लिपी यानेंच काढली हेंहि प्रसिद्ध आहे. तेव्हां हा प्रघात यादव राजांच्या अमदानींत हेमाडपंतानें सुरू केला असा तर्क केला असतां तो ज्यास्त संभवनीय दिसतो. यादवांच्या अमलाची मर्यादा दक्षिणेकडे कृष्णेपलीकडेहि गेली होती ही गोष्ट पुढील भागांत येणार आहे. तेव्हां गुलबर्गा वगैरे प्रान्तांत कानडी भाषा बोलणारे सामान्य जन असूनहि सरकारी पाटिलकुळकर्ण्यांचे कागदपत्र व बाजारच्या व्याऱ्यांचे जमाखर्च मराठींत व मोडींत राज्यकर्त्यांच्या सोईसाठीं व्हावें हें उचित आहे. हल्लींसुद्धां पुष्कळ ठिकाणीं दप्तर इंग्रजींत झालें आहे. जमिनींचा धारा आणि व्यापारावरचा शुल्ककर हे सरकारी देणें त्यावेळीं असल्यानें त्याचे कागदपत्र मराठींत व मोडींत ठेवणें जरूर होतें. तात्पर्य, हा प्रघात यादव राजांच्या वेळीं पडला असावा असा तर्क ठीक बसतो.

याच्याहि पूर्वीं गेल्यास राष्ट्रकूटांचें मराठीच राज्य गुलबर्गा जिल्ह्यांतच मलखेड येथें होतें; तेव्हां प्रजा कानडी बोलत किंवा मराठी या प्रश्नाचें उत्तर या भागांत संदिग्ध दिलें आहे. मुसलमानांनीं किरिया नांव ज्या भाषेला दिलें आहे ती भाषा कानडी किंवा मराठी हें संदिग्धच राहिलें आहे (पृष्ठ २७४ पहा). महाराष्ट्रांत कानडी भाषा कृष्णेच्या अलीकडे केव्हां शिरली हा एक ऐतिहासिक मनोरंजक प्रश्न आहे. हल्लीं हा गुलबर्गा प्रान्त सोलापुरच्या दक्षिणेस कानडीच्या सीमेवर सल्यानें येथें दोन्ही भाषा बहुधा समजतात. तथापि मळ लोकांची

भाषा कानडी किंवा मराठी हें ठरविण्यास प्राचीन राष्ट्रकूटांच्या वेळचे कागदपत्र सांपडतील तर फारच प्रकाश पडेल. दुर्दैवानें मोंगलांच्या पूर्वीचे कागदपत्र देशमुख, देशपांडे यांकडे अद्याप तलास केला तरी उपलब्ध झाले नाहींत. मलखेडजवळ हेळंव नांवाचें एक मोठें तालुक्याचें ठिकाण आहे, तेथें एक जुनें शंकराचे देऊळ आहे आणि सुमारें ७५ फूट उंचीचा एक दगडाचा पण फूट दोनफूट घेराचा स्तंभ देवळासमोर उभा आहे. हा आश्चर्यकारक स्तंभ कोणी केव्हां उभा केला ? याचे कागदपत्र मिळाल्यास या अनेक प्रश्नांवर चांगला प्रकाश पडेल. हे जमाखर्च व कागद इतिसंशोधकांनीं मिळविण्याचा जरूर प्रयत्न करावा.

महाराष्ट्राच्या राजधान्या बहुतेक याच प्रान्तांत पूर्वीपासून झाल्या असल्यानें येथें मुळांत मराठी भाषा असावी असा अंदाज होतो. पूर्व-चालुक्यांची राजधानी बदामी विजापुराजवळ कृष्णेच्या उत्तरेस आहे. राष्ट्रकूटांची राजधानी येथेंच कोठेंतरी असावी (मलखेडास किंवा गुल-बर्ग्यास बदामीच्या उजरेस). उत्तर चालुक्यांची राजजानी कल्याण गुलबर्ग्याच्या उत्तरेस आणि यादवांची राजधानी देवगिरीस त्याच्याहि उत्तरेस. नंतर मुसलमानी बहामनी राज्य झालें तेंहि गुलबर्ग्यास व नंतर कल्याणजवळील बेदरास. तात्पर्य, हा देशाचा भाग मध्यवर्ती, किंबहुना दक्षिणेकडील पांड्य, चोल, केरल, गांग वगैरेच्या तोंडावर असून राजधानीस योग्य असा समजला जात असे व तो योग्य तऱ्हेनें जात असे हें नमूद करून हा लेख पुरा करतों.

**समाप्त.**

मुद्रकः—केशव रावजी गोंधळेकर. जगद्धितेच्छु प्रेस, पुणें.
प्रकाशकः—चिंतामण विनायक वैद्य, २९९ सदाशिव पेठ पुणें सिटी.